सामाजिक वनीकरण विभागांतर्गत, मानव संसाधन विकास "जाहिरात, प्रसिध्दी व प्रशिक्षण" या योजनेसाठी सन २०१५-१६ या वर्षाकरीता अनुदान वितरणास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अंदाज-२०१५/ प्र.क्र. ४० /फ-११**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

तारीख: २९ मे,२०१५

<u>वाचा :-</u>

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र.एसएलएफ-१८९२/प्र.क्र.१५९/जल-१४, दि.२८जाने, १९९३

२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-१८९३/प्र.क्र.३०/जल-१२, दि.२६.८.१९९३

३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र.एसएलएफ-२०१२/प्र.क्र.५२/जल-१२, दि.१८.६.२०१२

४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र.एसएलएफ-२०१३/प्र.क्र.५६/जल-१२, दि.०६.०७.२०१३

५) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.१९/जल-१२, दि.१७ मे, २०१४ व दि. ०४.१२.२०१४,दि.७.०३.२०१५

६) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.१९/जल-१२, दि.१७ मे, २०१४ व दि. ०४.१२.२०१४,दि.७.०३.२०१५

७) वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५ /प्र.क्र.८५ /अर्थसंकल्प-३, दि. १७एप्रिल,२०१५

८) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-बीयुडी- २०१५/२४०६/प्र.क्र.१०२/ब-१, दि. २१.०४.२०१५

९) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.१९/जल-१२, दि.१७ मे, २०१४ व दि. ०४.१२.२०१४,दि.७.०३.२०१५

१०) प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/ प्र.क्र.७/४४४/१५-१६, दि.१५.०५.२०१५

## प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरणाचे महत्व व वनीकरणाच्या पध्दतीची माहिती सामान्य नागरीकांना देऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याबाबत त्यांना उद्युक्त करण्यासाठी सामाजिक वनीकरणांतर्गत जाहिरात, प्रशिक्षण व प्रसिध्दी हा कार्यक्रम सन १९९२-९३ पासून कार्यान्वित करण्यात आला आहे. या योजनेसाठी सन २०१५-१६ या वर्षाकरीता रु. ३२१.३० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ७ येथील दि. १७.४.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रथम आठ महिन्याकरीता अर्थसंकल्पीत निधीपैकी ७०% मर्यादेत रक्कम खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्रमांक-८ येथील दि.२१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे सुपूर्द करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने सदर योजनेसाठी माहे एप्रिल ते नोव्हेंबर, २०१५ या प्रथम आठ महिन्यांच्या खर्चाकरीता एकूण मंजूर तरतूदीच्या ७०% मर्यादेत म्हणजेच रु.२२४.९१ लाख इतके अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सामाजिक वनीकरणांतर्गत -"जाहिरात, प्रसिध्दी व प्रशिक्षण " या योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल ते नाव्हेंबर २०१५ या आठ महिन्यांकरीता रु. २२४.९१ लाख (रुपये दोनशे चोवीस लाख एक्याण्णव हजार फक्त) इतके अनुदान मंजूर व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

विवरण पत्र-१ प्रमाणे माहे एप्रिल ते नाव्हेंबर, २०१५ मधील कॅशफ्लो सोबत जोडला आहे.

२. या योजनेअंतर्गत वरील मंजूर निधीतून विविध स्पर्धांचे आयोजन, सामाजिक वानिकि ग्राम जागृती कार्यक्रम, प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत चर्चासत्र, वनमहोत्सव कार्यक्रम, वृक्षदिंडी कार्यक्रम, महत्वाचे विविध दिन साजरे करणे, एस.टी./रेल्वेचे माध्यमातून सामाजिक वनीकरणाची जाहिरात, दूरदर्शन/आकाशवाणीसाठी प्रायोजित कार्यक्रम तयार करुन त्यांचे प्रसारण करणे, छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार वितरण कार्यक्रम तसेच, उपसंचालक, सहाय्यक संचालक, लागवड अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग व प्रत्यक्ष काम करणारे मजूर आणि शेतक-यांसाठी विविध प्रशिक्षणे, निसर्ग शिक्षण केंद्र निर्मिती व तंत्रज्ञान हस्तांतरण इत्यादि कामे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. सदर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर योजनेची अंमलबजावणी प्रचलीत अटी व शर्तीच्या अधिन

राहून करावी. तसेच जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा / झालेल्या खर्चाचा तपशील देखिल शासनास सादर करण्यात यावा.

४. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन ०१-वनीकरण - ००१ - संचालन व प्रशासन (००) (०३) (२४०६ -८५८९)- २६ जाहीरात व प्रसिध्दी, ५०-इतर खर्च (प्रशिक्षण) योजनांतर्गत-दत्तमत

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने परिपत्रक क्र. अर्थसं -२०१५ //प्र.क्र.८५ /अर्थसंकल्प-३, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२९१६४७५०८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.05.29 16:52:46 +05'30'

**डी.एल. थोरात**

सह सचिव, (वने ) महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३ ) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे

४) सर्व मुख्य वनसंरक्षक व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, (कोकण) ठाणे, पुणे, नाशिक,औरंगाबाद, अमरावती, नागपूर,

५) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)

६) महालेखापाल, (लेखापरीक्षा )महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर

७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता )महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर

८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९) कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प १७ वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२

१०) कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११)सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

१२)निवडनस्ती/फ-११

# विवरण पत्र -१

शासन निर्णय क्र. अंदाज-२०१५/ प्र.क्र.४०/फ-११,दि. २९. ०५.२०१५

योजनेचे नाव:- जाहिरात, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९ )

एकूण रु.२२४.९१ लाख

(रु. लाखात)

| सविस्तर शिर्ष | प्रसतावांतर्गत मागणी केलेली रक्कम | एप्रिल, २०१५ | मे, २०१५ | जून, २०१५ | जुलै, २०१५ | ऑगस्ट, २०१५ | सप्टें, २०१५ | ऑक्टो, २०१५ | नोव्हे., २०१५ | एकूण मागणी केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २६-जाहिरात व प्रसिध्दी | १५०.४३ | १८.०० | १८.०० | २४.०० | २४.०० | १६.०० | १६.०० | १७.०० | १७.४३ | १५०.४३ |
| ५०-इतर खर्च (प्रशिक्षण ) | ७४.४८ | १२.०० | १२.०० | ९.०० | ९.०० | ९.०० | ६.०० | ६.०० | ११.४८ | ७४.४८ |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.05.29 16:53:09 +05'30'

**(डी.एल. थोरात)**

सहसचिव, (वने)

महसूल व वन विभाग